वितरण आदेश क्र.१

"सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती योजनेचा निधी वितरीत करण्याबाबत"

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: शिवृत्ती-२०२४/प्र.क्र.३९/शिक्षण-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०४ जून, २०२४

**संदर्भ** :- (१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४
(२) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचे पत्र क्रमांक इ.मा.ब.क.सं/ शिक्षण/तरतूद मागणी/२०२४/पुणे/१६३४, दिनांक १६.०५.२०२४

**प्रस्तावना:-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण या लेखाशिर्षाखालील ३४-शिष्यवृत्ती / विद्यावेतने उद्दिष्टांतर्गत विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग व इतर मागास वर्ग या प्रवर्गातील विद्यार्थ्यांना मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती व फ्रीशिप इ. करिता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी शासन परिपत्रक वित्त विभाग संदर्भ क्र.१ अन्वये एप्रिल ते जुलै २०२४ च्या महिन्यांकरिता बीम्स प्रणालीवर उपलब्ध निधीचे वितरण संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांच्याकडे करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात राज्यातील विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग व इतर मागासवर्ग या प्रवर्गातील विद्यार्थ्यांना मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती व फ्रिशिप योजनेसाठी २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण या लेखाशिर्षातंर्गत ३४-शिष्यवृत्ती व विद्यावेतन या उद्दिष्टांतर्गत शिष्यवृत्ती / फ्रीशीप अदा करण्यासाठी मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीपैकी शासनाच्या वित्त विभागाने लेखानुदानात एप्रिल ते जुलै २०२४ च्या महिन्यांसाठी बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधीपैकी एकूण रु.५५२.३३३२ कोटी (अक्षरी रुपये पाचशे बावन्न कोटी तेहतीस लाख बत्तीस हजार फक्त) इतका निधी खालील विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे:-

(रुपये कोटीत)

| क्र. | लेखाशिर्ष | वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेली तरतूद | वितरीत केलेला निधी | संचालक कार्यालया कडील मागणी | वितरीत करावयाची तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | २२२५ई८८४ | १९३.३३३३ | ०.४९०६५५४ | ५४२.८९०० | १८०.०००० |
| २ | २२२५ई९०१ | ५.०००० | ० | ११.८१०० | ५.०००० |
| ३ | २२२५ई९१९ | ६६.६६६६ | ०.३२८७२५१ | ११५.६९०० | ६०.०००० |
| ४ | २२२५ई९३७ | १.६६६६ | ० | ४.१४०० | १.६६६६ |
| ५ | २२२५ई९४६ | ४५.०००० | ०.०५६९३५१ | १२०.५९०० | ३४.०००० |
| ६ | २२२५ई९५५ | १.६६६६ | ० | ५.१८०० | १.६६६६ |
| ७ | २२२५ई९७३ | ७५.०००० | ०.०२०२४०७ | १३७.५१०० | ७०.०००० |
| ८ | २२२५F००२ | २१०.०००० | ०.०५९०४३१ | ६८३.८५०० | २००.०००० |
| **एकूण** | | **५९८.३३३१** | **०.९५५५९९४** | **१६२१.६६** | **५५२.३३३२** |

२. सदर शिष्यवृत्ती व फ्रिशिप योजनेकरिता संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे हे नियंत्रक अधिकारी राहतील. उपरोक्त प्रमाणे वितरीत तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनासाठी खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर खर्चाचे विवरण (जिल्हानिहाय खर्च/लाभार्थी संख्या) व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

३. योजनेंतर्गत चालू आर्थिक वर्षातील खर्चाचे तसेच मागील वर्षातील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे तपासण्याच्या अधिन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील. तसेच वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका तसेच वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकातील अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करतांना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

४. नियंत्रक अधिकारी उक्त निधी वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकामधील अटींची पूर्तता झाली असल्याची खातरजमा करुन वितरीत करावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०१.०४.२०२४ च्या परिपत्रकान्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०६०५१२४२५६५४३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT,
2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2024.06.05 12:56:44 +05'30'

**( कैलास साळुंके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव.
२. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. सर्व प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण
९. सर्व सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. निवड नस्ती (शिक्षण-१)